**सन २०२०-२१ मध्ये प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत -प्रति थेंब अधिक पीक घटकाच्या अंमलबजावणीसाठी रु.५१८.०५ कोटी निधीच्या कार्यक्रमास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे.....**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं- ०५२०/प्र.क्र.५८/१४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २१ ऑक्टोबर, २०२०

संदर्भ:-

१) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.
२) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत - प्रति थेंब अधिक पीक - पाणी व्यवस्थापनाच्या पुरक बाबी (Volume-II) च्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.
३) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक १७-३/२०२०-RFS-III, दिनांक १८ मे, २०२०.
४) कृषि व पदुम विभागाचे पत्र क्र.PMKSY-०१२०/C.R.०१/१४-A, दि. १६ मार्च, २०२० अन्वये निर्गमित राज्य स्तरीय मान्यता समितीच्या (SLSC) ९ व्या बैठकीचे इतिवृत्त.
५) कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. प्रकृसिं-०५१९/प्र.क्र.५३/१४ अे दि. ११ जून, २०२०
६) कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. प्रकृसिं-०५२०/प्र.क्र.५८/१४ अे दि. १८ जून, २०२०
७) अवर सचिव, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. १८-१०/२०२०-RFS-III (FTS-८४६३४), दि. ११ ऑगस्ट, २०२०.
८) कृषि व पदुम विभागाचे पत्र क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.५८/२अे, दि-१२ ऑक्टोबर, २०२०.

प्रस्तावना:

सन २०१५-१६ पासून प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत-प्रति थेंब अधिक पीक घटकाची अंमलबजावणी राज्यात करण्यात येत आहे. सदर घटकामध्ये सुक्ष्म सिंचन व पाणी व्यवस्थापनाच्या पुरक बाबी अशा दोन उप घटकांचा समावेश आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०: ४० असे आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.१८ मे, २०२० च्या पत्रान्वये केंद्र हिश्श्याचा रू.४०० कोटी एवढा नियतव्यय कळविलेला आहे. त्यापैकी आवश्यकतेनुसार निधी पाणी व्यवस्थापनाच्या पुरक बाबीसाठी वापरण्याचे सूचित केले आहे. तथापि, त्यासाठीची महत्तम मर्यादा २०% एवढी असेल असेही सूचित केले आहे. त्यानुसार, केंद्र हिश्श्याचा रू. ४०० कोटी व त्यास समरूप राज्य हिश्श्याचा रु.२६६.६७ कोटी अशा एकूण रू. ६६६.६७ कोटी रकमेचा कार्यक्रम सन २०२०-२१ या

वर्षात राबविणे अपेक्षित आहे तथापि, वित्त विभागाच्या दि. ४ मे, २०२० च्या शासन निर्णयानुसार, योजनेकरीता अर्थसंकल्पिय निधीच्या मंजूर तरतूदीच्या ३३% च्या मर्यादेत रु.१९१.३३ कोटी निधीच्या कार्यक्रमास दि.१८ जून, २०२० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

वित्त विभागाने मागील वर्षातील पुनर्जिवित निधी व सन २०२०-२१ या वर्षातील पहिल्या हप्त्यात प्राप्त झालेला निधी मिळून उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतूदीच्या मर्यादेत प्रशासकीय मान्यता देण्यास अनुमती दिलेली आहे. त्यानुसार, मागील वर्षातील पुनर्जिवित निधी रु.१९९.७२ कोटी व चालु वर्षाचा रु.३१८.३३ कोटी अशा एकूण रु.५१८.०५ कोटी निधीच्या कार्यक्रमास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :</u>**

I. प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पिक घटकाची राज्यात सन २०२०-२१ या वर्षात अंमलबजावणी करण्यासाठी रु.५१८.०५कोटी (रु.पाचशे अठरा कोटी पाच लाख फक्त) निधीच्या कार्यक्रमास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

II. यामध्ये केंद्र हिस्सा रु.३१०.८३ कोटी (रु.तीनशे दहा कोटी त्र्याऐंशी लाख फक्त) व राज्य हिस्सा रु.२०७.२२ कोटी (रु.दोनशे सात कोटी बावीस लाख फक्त) निधीचा समावेश आहे.

III. मंजुर कार्यक्रमाच्या निधीचा प्रवर्गनिहाय तपशील खालीलप्रमाणे आहे:-

**(रक्कम रु. कोटीत)**

| | **दि.१८/०६/२०२० शा.नि. न्वये दिलेली प्रशासकीय मान्यता** | | | **या शा.नि. न्वये देण्यात येणारी अतिरिक्त प्रशासकीय मान्यता** | | | **एकूण प्रशासकीय मान्यता** | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **प्रवर्ग** | **केंद्र** | **राज्य** | **एकूण** | **केंद्र** | **राज्य** | **एकूण** | **केंद्र** | **राज्य** | **एकूण** |
| **सर्वसाधारण** | १०० | ६६.६७ | १६६.६७ | १७५.८३ | ११७.२२ | २९३.०५ | २७५.८३ | १८३.८९ | ४५९.७२ |
| **अ.जा.** | ८ | ३.३३ | ११.३३ | ०७ | ६.६७ | १३.६७ | १५ | १० | २५ |
| **अ.ज.** | ८ | ५.३३ | १३.३३ | १२ | ८.०० | २०.०० | २० | १३.३३ | ३३.३३ |
| **एकूण** | **११६** | **७५.३३** | **१९१.३३** | **१९४.८३** | **१३१.८९** | **३२६.७२** | **३१०.८३** | **२०७.२२** | **५१८.०५** |

IV. प्रशासकीय मंजुरी दिलेल्या निधीच्या कार्यक्रमापैकी प्रत्यक्षात रु.३६६.७२ कोटी निधीचा कार्यक्रम पुनर्जिवित निधीच्य कार्यक्रमासह राबविण्याची कार्यवाही करावी. यामध्ये यापूर्वी संदर्भाधिन दि.११ जून, २०२० च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेल्या रु. १०० कोटी निधीचा सुद्धा समावेश आहे.

V. चालु वर्षी या योजनेंतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीमधून सन २०१९-२० या वर्षातील पुर्व संमती प्राप्त सुक्ष्म सिंचन संचाची उभारणी करुन अनुदानासाठी प्रस्ताव सादर केलेल्या लाभार्थ्यांची प्रलंबित प्रकरणे प्रथत: निकाली काढण्यात यावीत.

VI. कृषि विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या सर्व योजनांचा लाभ घेण्यासाठी एकच अर्ज करण्यासाठी कृषि विभागाने महा डीबीडी पोर्टल विकसित केले आहे. सन २०१९-२० या

वर्षातील पुर्वसंमती प्राप्त अर्ज निकाली निघाल्यानंतर निधी शिल्लक राहिल्यास सन २०२०-२१ वर्षात महा डीबीटी पोर्टलवर नवीन अर्ज स्विकारण्यात यावेत व सदर अर्जांना उपलब्ध निधीच्या मर्यादेत पुर्वसंमती देऊन निकाली काढावेत.

VII. आवश्यकतेनुसार आयुक्त (कृषि) यांनी निधी उपलब्ध करुन देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास वेळोवेळी सादर करावा.

VIII. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून त्यानुसार या कार्यक्रमाची अंमलबजावणी राज्यातील सर्व जिल्हयात करण्याकरिता जिल्हास्तरावर अवलंबावयाच्या योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती बाबतच्या सूचना निर्गमित करण्याकरिता संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२११३४३४४९१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.10.21 13:47:30 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (कृषी / फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (कृषी व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
३) सचिव (कृषी) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (जलसंधारण व रोजगार हमी योजना), जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) आयुक्त (कृषी),कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) जिल्हाधिकारी (सर्व)
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
११) सर्व विभागीय कृषी सहसंचालक
१२) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
१३) सर्व कृषी विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषी अधिकारी/सर्व तालुका कृषी अधिकारी/

१४) सर्व मंडळ कृषी अधिकारी

१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर

१७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई

१८) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई

१९) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.

२०) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर

२१) उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण /नाशिक /पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर

२२) सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२

२३) निवडनस्ती.